शासकीय संगणक टायपिंग प्रमाणपत्र (GCC-TBC) ४० श.प्र.मि.व Special Course in Computer Typing For Instructors & Students (GCC-SSD-CTC) परीक्षेसाठी ग्रेस गुणांची तरतूद करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: परीक्षा -२०१६/प्र.क्र.१७२/एस.डी.-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०१७

वाचा- १) शासन निर्णय क्र.एसपीई-१०१२/(१०८/१२)/साशि-१,दि.३१ ऑक्टोंबर,२०१३

२) शासन पत्र क्र.परीक्षा-२०१६/प्र.क्र.१७२/एस.डी.२,दि.२७ ऑक्टोंबर,२०१६
3) RULES FOR THE GOVERNMENT COMMERCIAL CERTIFICATE EXAMINATION MAHARASHTRA STATE.

**प्रस्तावना-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये शासन मान्यता प्राप्त वाणिज्य शिक्षण संस्थांमध्ये संगणक टंकलेखन अभ्यासक्रम सुरु करण्यात आला आहे.सदर अभ्यासक्रमाच्या गुणदान योजनेमध्ये ग्रेस गुणांची तरतूद नाही.शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र परीक्षेच्या विभाग १ मध्ये ५ ग्रेस गुणांची तरतूद आहे.संगणक टंकलेखनाची ३० श.प्र.मि.मराठी,हिंदी व इंग्रजी माध्यमाची परीक्षा एप्रिल-२०१६ मध्ये प्रथमतःच घेण्यात आली.सदर परीक्षेच्या निकालानंतर या परीक्षेत ग्रेस गुण देण्याबाबत विविध संस्था,संघटना यांच्याकडून मागणी करण्यात येत होती.त्यानुसार शासनाने संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये GCC-TBC ३० श.प्र.मि.परीक्षेसाठी ग्रेस गुणांची तरतूद केलेली आहे. आता,शासकीय संगणक टायपिंग प्रमाणपत्र GCC-TBC ४० श.प्र.मि.व परीक्षेसाठी Special Course in Computer Typing For Instructors & Students (GCC-SSD-CTC) परीक्षेसाठी ग्रेस गुणांची तरतूद करण्याची मागणी महाराष्ट्र राज्य टंकलेखन,लघुलेखन शासनमान्य संस्थांची संघटना,मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषदेस केली होती.सदर ग्रेस गुण देण्याबाबत परीक्षा परिषदेच्या कार्यकारी समितीने ठराव पारित करुन शासनाकडे पाठविला होता. सदर बाब विचारात घेऊन शासकीय टायपिंग प्रमाणपत्र (GCC-TBC) ३० श.प्र.मि.परीक्षेप्रमाणे ४० श.प्र.मि. व Special Course in Computer Typing For Instructors & Students (GCC-SSD-CTC) परीक्षेसाठी साठी ग्रेस गुणांची तरतूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासन निर्णय क्र.एसपीई-१०१२/(१०८/१२)/साशि-१,दि.३१ ऑक्टोंबर,२०१३ मधील परिशिष्ट GCC-TBC ४० श.प्र.मि. Typing Syllabus मधील विभाग १.१, १.२, १.३, १.४ साठी एकत्रित २ ग्रेस गुण आणि विभाग २.० मधील Computer Syllabus साठी २.० ग्रेस गुण अशा एकूण ४.० ग्रेस गुणांची तरतूद करण्यात येत आहे.

तसेच Special Course in Computer Typing For Instructors & Students (GCC-SSD-CTC) च्या अभ्यासक्रमातील अ.क्र.१,२,३,४ साठी ०२ ग्रेस गुण व अ.क्र.५ व ६ साठी ०२ ग्रेस गुण अशा एकूण ०४ ग्रेस गुणांची तरतूद करण्यात येत आहे.उपरोक्त तरतूदी जानेवारी/फेब्रुवारी-२०१७ च्या परीक्षेपासून लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३११७०३५०३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.03.31 17:05:43 +05'30'

(डॉ.सुवर्णा सि.खरात)
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई.
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी.
३) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक.
४) प्रधान सचिव (सामान्य प्रशासन विभाग) यांचे स्वीय सहायक.
५) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान विभाग),मंत्रालय,मुंबई.
६) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद,पुणे.
८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
९) सर्व शिक्षणाधिकारी माध्यमिक/प्राथमिक,जिल्हा परिषद.
१०) सर्व शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई.
११) अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य टंकलेखन/लघुलेखन वाणिज्य संस्थांची संघटना ७९, केटीआय, मार्केटयार्ड, अहमदनगर.
१२) निवडनस्ती (एसडी-२).